महात्मा गांधी स्मारक रुग्णालय, मुंबई या रुग्णालयास सन २०१३-१४ व सन २०१४-१५ या वित्तीय वर्षासाठी " मागणी क्रमांक आर-१, २२१० वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०१- नागरी आरोग्य सेवा- विषम चिकित्सा, १०२ - राज्य कामगार विमा योजना - (०१)(०४) महात्मा गांधी स्मारक रूग्णालय, परेल, मुंबई (२२१० ४५० ८) "या शिर्षा अंतर्गत मंजूर झालेला निधी कोषागारातून आहरित करण्यास मंजूरी मिळणेबाबत.

महाराष्ट्र शासन
सार्वजनिक आरोग्य विभाग
शासन निर्णय क्रमांकः एमजीएच-२०१४/प्र.क्र.३०६/१४/राकावि-२
जी.टी. हॉस्पिटल संकुल इमारत, मंत्रालय, मुंबई - ४०० ००१
तारीख: ०५ फेब्रुवारी, २०१५

वाचा :-

१) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्र.राकायो-२०१३/प्र.क्र.६२/१३/राकावि-२ , दि.२८ फेब्रुवारी, २०१३.
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अंदाज - २०१४/प्र.क्र.११०/अर्थसंकल्प-३ दि. १ जुलै,२०१४.
३) संचालक ( प्रशासन), राकावियो, मुंबई यांचे पत्र क्र. आयुक्त / राकावियो/अर्थसंकल्प वितरण प्रणाली/ १२३४९-५१ / का.क्र.७/२०१४, दि.१२ नोव्हेंबर, २०१४.

प्रस्तावना :-

महात्मा गांधी स्मारक रुग्णालयास २०१४-१५ या वित्तीय वर्षासाठी "मागणी क्रमांक आर-१, २२१० वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०१ नागरी सेवा - विषम चिकित्सा, १०२ - राज्य कामगार विमा योजना - (०१)(०४) महात्मा गांधी स्मारक रूग्णालय, परेल, मुंबई या शिर्षा अंर्तगत एकूण रू.३,५०,००,०००/- ऐवढे सहायक अनुदान मंजूर झाले आहे. त्यापैकी वेतनासाठी " सहायक अनुदान (वेतन) " अंतर्गत रू.३,५०,००,०००/- एवढया मंजूर अनुदानाच्या ८०% रक्कम वित्त विभाग परिपत्रक दि. १ जुलै,२०१४ येथील शासन परिपत्राकान्वये खर्च करण्यास /आहरित करण्यास मंजूरी देण्यात आलेली आहे.

२. वित्त विभागाच्या क्र.अंदाज-२०१४/प्र.क्र.११०/अर्थसंकल्प-३, दि.१ जुलै, २०१४ च्या परिपत्रकातील परिच्छेद २ नुसार, खर्चाची मर्यादा योजनेत्तरसाठी ८० % एवढी करण्यात आली असून

योजनेत्तर ( वेतनेत्तर ) निधी कोषागारातून आहरीत करण्यापूर्वी प्रशासकीय विभागांनी वित्त विभागाची मान्यता घेणे आवश्यक आहे.

**शासन निर्णय :-**

शासन आता या आदेशान्वये महात्मा गांधी स्मारक रूग्णालय, परळ, मुंबई साठी २०१४-१५ या वित्तीय वर्षात "मागणी क्रमांक आर-१, २२१० वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०१- नागरी आरोग्य सेवा- विषम चिकित्सा, १०२- राज्य कामगार विमा योजना - (०१)(०४) महात्मा गांधी स्मारक रुग्णालय, परेल, मुंबई (२२१० ४५० ८) " या लेखा शिर्षा अंतर्गत " ३१- सहाय्यक अनुदान (वेतनेत्तर) साठी मंजूर झालेल्या रू.३,५०,००,०००/- या अर्थसंल्पीय तरतूदीतून ८० % टक्के रक्कम म्हणजे रू. २,८०,००,०००/- ( रुपये दोन कोटी ऐंशी लाख फक्त) एवढी रक्कम कोषागारातून आहरित /खर्च करण्यास मंजुरी देत आहे.

२. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांच्या कडील अनौपचारीक मंजूर अनुदानातून संदर्भ क्र.,१०/२०१५/व्यय-१३ दि.१४ जानेवारी, २०१५ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२०५१३१६०४२५१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjay Giridhar Patil

Digitally signed by Sanjay Giridhar Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400001, st=Maharashtra, cn=Sanjay Giridhar Patil
Date: 2015.02.05 15:26:16 +05'30'

**( सं.गि.पाटील )**
महाराष्ट्र शासनाचे अवर सचिव

प्रत,

१. आयुक्त, राज्य कामगार विमा योजना, मुंबई.
२. संचालक, (वैद्यकीय/प्रशासन), रा.का.वि.यो. मुंबई..
३. सहायक संचालक, (लेखा), रा.का.वि.यो. मुंबई..
४. वैद्यकीय अधिक्षक, महात्मा गांधी स्मारक रुग्णालय, परेल, मुंबई..
५. महालेखापाल १-(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई.

६. महालेखापाल-१, (लेखा परिक्षा), महाराष्ट्र , मुंबई.
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
८. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
९. वित्त विभाग ( व्यय -१३ ), मंत्रालय, मुंबई.
१०. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), सा.आ.वि, मंत्रालय, मुंबई
११.निवड नस्ती ( राकावि - २ ).